**वन विभागाची पुनर्रचना - प्रधान मुख्य वनसंरक्षक कार्यालयासाठी नवीन पदांची निर्मिती या योजनेत्तर योजनेतील पदांना सन २०२५-२६ करीता मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक:एफडीएम २०२५/प्र.क्र.१६/फ-२**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- ११ मार्च, २०२५.

**वाचा** :- १) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. एमएफएस-२०१७/प्र.क्र.७७/फ-८, दि.१३.०९.२०१९ व दि.२१.०९.२०२१.
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक- एफडीएम २०२४/प्र.क्र.२१/फ-२ दि.०१.१०.२०२४.
३) उप वनसंरक्षक, (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर यांचे पत्र क्र.जा.क्र. कक्ष-३/योजनेत्तर/प्र.क्र.१४ (२४-२५)/५५१, दि.१४.०२.२०२५.
४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.पदनि २०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दि.०३.०३.२०२५.

**प्रस्तावना :-**

वन विभागाची पुनर्रचना-प्रधान मुख्य वनसंरक्षक कार्यालयासाठी नवीन पदांची निर्मिती या योजनेत्तर योजनेतील ५ अस्थायी पदांना "वाचा" क्र.२ येथील दि.०१.१०.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये दि.०१.०९.२०२४ ते दि.२८.०२.२०२५ पर्यंत चालू ठेवण्यास शासनाची मान्यता देण्यात आली होती. सदर पदांची मुदत दि.२८.०२.२०२५ रोजी संपुष्टात आली आहे.

महसूल व वनविभाग शासन निर्णय क्र. एएफओ-१०१३/प्र.क्र.२४१/फ-७, दि.२०.१०.२०२१ अन्वये भावसे संवर्ग नियम १९६६ च्या नियम क्र. ४ (२) अन्वये प्रधान मुख्य वनसंरक्षक (माहिती, तंत्रज्ञान व धोरण), नागपूर हे पद आस्थगित ठेवुन अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (माहिती, तंत्रज्ञान व धोरण), नागपूर हे पद तात्पुरत्या स्वरुपात बदल करण्यात आले आहे. सदर पदे पुढे चालू ठेवणे आवश्यक असल्याने, उप वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर यांनी उपरोक्त "वाचा" क्र.३ येथील दि.१४.०२.२०२५ रोजीच्या प्रस्तावान्वये, सदरहू ५ अस्थायी पदांना सन २०२५-२६ मध्ये पुढे चालू ठेवण्याबाबत शासनास विनंती केली आहे. "वाचा" क्र.४ येथील दि.०३.०३.२०२५ रोजीच्या वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये, दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आले आहेत. त्यानुसार सदर अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

वन विभागाची पुनर्रचना-प्रधान मुख्य वनसंरक्षक कार्यालयासाठी नवीन पदांची निर्मिती या योजनेत्तर योजनेतील पुढीलप्रमाणे दर्शविलेल्या विवरण पत्रातील ५ अस्थायी पदांना **दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत मुदतवाढ** देण्यात येत आहे. तसेच सदर मुदत वाढ, महसूल व वन विभागाने

"वाचा" क्र. १ येथील शासन निर्णयान्वये निश्चित केलेल्या आकृतीबंधात या पदांचा समावेश आहे व सदर पदे सहा महिन्यांपेक्षा जास्त कालावधीसाठी रिक्त नाहीत या अटीच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | **अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (माहिती, तंत्रज्ञान व धोरण)** | १ |
| २ | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संरक्षण) | १ |
| ३ | उप वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) | १ |
| ४ | स्वीय सहायक | २ |
| | **एकूण** | **५** |

**२.** सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०३.०३.२०२५ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे. तथापि, सदरहू शासन निर्णयातील तरतुदींचे योग्यरित्या पालन होईल, याची दक्षता प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी घ्यावी.

**३.** याबाबत होणारा खर्च 'प्रधान शीर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन (योजनेत्तर) ०१ वनीकरण, ००१ संचालन व प्रशासन (०१) (०१) मुख्य वनसंरक्षक (२४०६ ००२२) ०१ वेतन या लेखाशीर्षाखाली दर्शविण्यात यावा व सन २०२५-२६ या वर्षी त्याखालील मंजूर होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३१११५५१०९७५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

RAMESH NAMDEO JAGTAP

Digitally signed by RAMESH NAMDEO JAGTAP
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=0c19f5aff07e8e032316c50df2eee86d4eadc6e4ac1e502c4ce53a7762e7e059, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B42F1BB542CD2BC481C3C6F994B28EBD58BB368E14A9C6CBD23808C8315A965C, cn=RAMESH NAMDEO JAGTAP
Date: 2025.03.11 15:51:49 +05'30'

**(रमेश जगताप)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रतिलिपी** :-

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (सर्व)
४) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता)/ लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता) / लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
६) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
७) वित्त विभाग, व्यय १०/अर्थसं-४/ मंत्रालय, मुंबई
८) नियोजन विभाग (१४७५), मंत्रालय, मुंबई
९) वन विभागातील सर्व कार्यासने, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) कार्यासन अधिकारी, ब-१ महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
११) निवडनस्ती, फ-२ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.